गृह विभाग

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ९ ऑगस्ट, २००५.

**अधिसूचना**

क्रमांक एमसीटी-०५०४/प्र.क्र.७७/परिवहन-५:- मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई येथील अतिरिक्त प्रबंधक या रिक्त पदावर कुमारी रत्नमाला दत्तात्रय परब, सहाय्यक प्रबंधक/शिरस्तेदार, शहर दिवाणी न्यायालय, मुंबई यांची शासन अधिसूचना क्रमांक एमसीटी-०५०४/प्र.क्र.७७/परिवहन-५, दिनांक २८ एप्रिल, २००५ अन्वये बदलीने नियुक्ती करण्यात आली होती. मा. उच्च न्यायालयाच्या शिफारशीनुसार कुमारी रत्नमाला दत्तात्रय परब यांची मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई येथील प्रबंधक या रिक्त पदावर नियुक्ती दिल्यामुळे अतिरिक्त प्रबंधक हे पद रिक्त झाले आहे.

आता मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई येथील अतिरिक्त प्रबंधक या रिक्त पदावर श्री. संजय हेमचंद्र नेरुरकर, सहाय्यक प्रबंधक/शिरस्तेदार, शहर दिवाणी न्यायालय, मुंबई यांची रु.७४५०-११५०० या वेतनश्रेणीत शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत बदलीने नियुक्ती करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशावरुन व नावाने,

( रमेश शिंदे )
शासनाचे उप सचिव.

* * * * *

क्र.एमसीटी-०५०४/प्र.क्र.७७/परि.५,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक :- ९ ऑगस्ट, २००५.

प्रति,

महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,
अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई,
प्रबंधक, शहर व दिवाणी न्यायालय, मुंबई,
प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई,
महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) १/२, मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
श्री. संजय हेमचंद्र नेरुरकर, सहाय्यक प्रबंधक/शिरस्तेदार, शहर दिवाणी न्यायालय, मुंबई,
वित्त विभाग, व्यय-८, वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती.
व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नी रोड, मुंबई - ४०० ०२०.
(शासन राजपत्रात प्रसिध्द करुन ५० प्रती पाठविण्यासाठी)

( रमेश शिंदे )
शासनाचे उप सचिव.